

PRATHAM BOOKS
A Book in Every Child's Hand

# भली मोठ्ठी काडेपेटी

**Author:** Arvind Gupta
**Illustrator:** Meenal Singh
**Translator:** Sandhya Taksale

वाचन पातळी २



प्रेम दुसरीत होता. घराजवळच्या महानगरपालिकेच्या शाळेत तो जायचा. त्याच्या शाळेतल्या ताई खूप उत्साही होत्या. त्यांच्या डोक्यात काय काय भन्नाट कल्पना यायच्या.



एक दिवस ताई मुलांना म्हणाल्या, “तुम्ही एक रिकामी काडेपेटी शोधा आणि नंतर ती काडेपेटी भरून आणा. काय काय भराल तिच्यात?

जेवढ्या म्हणून वेगवेगळ्या वस्तू तिच्यात भरता येतील तेवढ्या भरायच्या. एका आठवड्यात हे करायचं. सर्वात जास्त वेगवेगळ्या
वस्तू काडेपेटीत भरून आणणाऱ्याला
मी पुढच्या आठवड्यात बक्षीस देणार आहे.”



प्रेमला ही कल्पना आवडली.

प्रेमनं त्याचा खोडरबर आणि पेन्सिलला टोक करायचं यंत्र काडेपेटीत ठेवण्याचं ठरवलं. पण दोन्ही वस्तू तशा मोठ्या होत्या. त्यांपैकी फक्त एकच वस्तू काडेपेटीत मावत होती.

मग तो विचार करू लागला,
‘मी या काडेपेटीत काय काय
ठेवू शकतो?’

गृहपाठ करत असताना प्रेमच्या पेन्सिलचं टोक मोडलं आणि आतला शिश्याचा बारीक काळा तुकडा बाहेर आला.

त्यानं तो छोटा तुकडा काडेपेटीत ठेवून दिला.

मग त्यानं पेन्सिलला टोक केलं आणि बाहेर पडलेली लाकडाची छोटी छोटी गोल गोल सालं काडेपेटीत ठेवून दिली.







प्रेम आता बारकाईने बारीक बारीक वस्तू शोधू लागला. आई स्वयंपाकघरात पोहे करत होती. त्याच्या नाकात तो खमंग वास शिरला. तो लगेच स्वयंपाकघरात गेला.

तिथं त्याला बारीक मोहरी सापडली, जिऱ्याचा बारीक दाणा सापडला आणि लाल मिरचीचं बारीक बीही सापडलं. त्यानं साखरेचा एक कण, तांदळाचा एक दाणा, गव्हाचा एक दाणा घेतला. त्यानं हे सारं काडेपेटीत ठेवून दिलं.

या छोट्या छोट्या दाण्यांबरोबरच मका, बाजरी, हरभरा आणि इतर काही धान्यांचा एकेक दाणा त्यानं काडेपेटीत ठेवून दिला.



दुसऱ्या दिवशी त्यानं काडेपेटीत एक रबर बॅण्ड, लोकरीचा एक धागा, एक केस आणि एक दोऱ्याचा तुकडा ठेवून दिला.

आता बारक्या बारक्या गोष्टी शोधायचं प्रेमला वेडच लागलं.

दुसऱ्या दिवशी त्यानं गुलाबाचा काटा, सूर्यफुलाची पाकळी, गवताची काडी, चहाची पत्ती, चिंचेचं पान आणि एक छोटा खडा काडेपेटीत ठेवून दिला.



इतक्या साऱ्या वस्तू भरूनही काडेपेटीत अजून जागा शिल्लक होती.

मग प्रेमनं काडेपेटीत कागदाचा छोटा तुकडा, टाचणी, सुई, मणी, नख आणि एक लहानसं बटण टाकलं.

काडेपेटी अजूनही भरलेली नव्हती.

आठवड्याच्या शेवटच्या दिवशी प्रेमनं काडेपेटीत लिंबाची बी, संत्र्याची बी आणि भोपळ्याची बी टाकली. आता मात्र काडेपेटी गच्च भरली. तिच्यात ठेवायला आता इवलीशीही जागा उरली नाही.



शाळेत प्रत्येक मुलानं आणि
मुलीनं आपापल्या काडेपेटीत भरलेल्या वस्तू
मोजून दाखवायला सुरुवात केली.

कुणाच्या पन्नास वस्तू भरल्या
तर एका मुलानं तब्बल शंभर
वस्तू काडेपेटीत भरून
आणलेल्या होत्या.



प्रेमची पाळी आली तेव्हा त्यानं त्याची काडेपेटी हवेत धरून जोरात हलवली. काडेपेटी खच्चून भरलेली होती त्यामुळे तिचा आवाज काही झाला नाही.

प्रेमनं त्याची काडेपेटी रिकामी केली तेव्हा सर्वांनाच आश्चर्य वाटलं.



त्या वस्तू मोजल्या तेव्हा त्या
एकशे पन्नास भरल्या. अबबबब! बाकीच्या
मुलांच्या वस्तूंची संख्या प्रेमच्या संख्येच्या
आसपासही
कुठं नव्हती.

मग प्रेमला रंगीत क्रेयॉनची नवीकोरी पेटी भेट
मिळाली.

## Story Attribution:

This story: भली मोठ्ठी काडेपेटी is translated by Sandhya Taksale . The © for this translation lies with Pratham Books, 2017. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Derived from: 'कितनी बड़ी माचिस!', by Manisha Chaudhry . © Pratham Books , 2017. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Based on Original story: 'The Big, Big Matchbox', by Arvind Gupta . © Pratham Books , 2017. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. This story may have intermediate versions between the root and parent story. To see all versions, please visit the links.

## Other Credits:

'Bhalee Moththee Kaadepetee' has been published on StoryWeaver by Pratham Books. The development of this book has been supported by Parag, an initiative of Tata Trusts. www.prathambooks.org

## Illustration Attributions:

Cover page: Schoolchildren with matchboxes, by Meenal Singh © Pratham Books, 2017. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 2: Woman and children with matchbox, by Meenal Singh © Pratham Books, 2017. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 3: Woman bends sideways, by Meenal Singh © Pratham Books, 2017. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 4: Boy sits at table with cat, by Meenal Singh © Pratham Books, 2017. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 5: Cat and pencil, by Meenal Singh © Pratham Books, 2017. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 6: Boy smells food, by Meenal Singh © Pratham Books, 2017. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 7: Houses, trees, roads, by Meenal Singh © Pratham Books, 2017. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 8: Board pin, pair of hands, button, by Meenal Singh © Pratham Books, 2017. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 9: Red and white matchbox, by Meenal Singh © Pratham Books, 2017. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.






The development of this book has been supported by Parag, an initiative of Tata Trusts.

# भली मोठ्ठी काडेपेटी

(Marathi)

प्रेम आणि त्याच्या मित्रांना छोट्याशा काडेपेटीने चांगलंच काम लावून दिलं. तुम्हीपण ही कामगिरी घरच्या घरी पार पाडू शकता. तुमचा वेळ मजेत जाणार ही हमी आम्ही नक्की देतो.

या पुस्तकाची वाचन पातळी २ आहे. ओळखीचे शब्द जाणून वाचणाऱ्या आणि मदत घेऊन नवे शब्द वाचू शकणाऱ्या मुलांसाठी.

